नेहरू बाल पुस्तकालय



# पिऊ आणि तिचे जादुई मित्र

कथा आणि रेखाचित्रे

**सोरित गुप्तो**

अनुवाद

**राधिका गोडबोले**



nbt.india
एकः सूते सकलम्
नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया



**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**ची स्थापना पुस्तकांचा प्रचार आणि वाचन अभिरुचीचा विकास या उद्देशाने सन 1957 मध्ये भारत सरकारच्या (उच्च शिक्षण विभाग, मनुष्य संसाधन विकास मंत्रालय) द्वारा केली गेली आहे. लहान मुलांच्या पुस्तकांच्या प्रकाशनास संस्थेतर्फे नेहमीच प्राथमिकता दिली जाते. भारतातील वेगवेगळ्या वयोगटांतील मुलांसाठी प्रथितयश बहुभाषिक बाल-वाङ्मय प्रकाशन असलेल्या ट्रस्टने आतापर्यंत इंग्रजीसहित 30 पेक्षा अधिक भाषा आणि बोलींमधील रंगीत आणि सचित्र पुस्तके मुलांना त्यांच्या मातृभाषेतून उपलब्ध करून दिली आहेत. बाल आणि कुमारवयीन मुलांसाठी असलेली ही सर्व पुस्तके नेहरू बाल पुस्तकालय ह्या मालिकेद्वारा प्रकाशित केली जातात.

ISBN 978-81-237-9019-0

प्रथम प्रकाशन : 2019 *(शके* 1941)



Piu Aur Uske Jadui Dost *(Hindi Original)*
Piu ani Tiche Jadui Mitra *(Marathi)*

**₹ 50.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इन्स्टिट्युशनल एरिया, फेज-II
वसंत कुंज, नवी दिल्ली-110 070 यांनी प्रकाशित केले.

www.nbtindia.gov.in





सकाळपासून जोरदार पाऊस पडत होता. काळ्या ढगांमुळे भरदिवसाही अंधारून आलं होतं, विजा चमकत होत्या. अशा या वातावरणात सगळेजण आपापल्या घरात बसले होते. माणसंच नव्हे तर चिमण्या, कुत्री, मांजरं, गायी, बकऱ्याही आपापल्या घरट्यात, गोठ्यात गुडीगुप्प होऊन बसले होते. चहूकडे पाणीच पाणी झालेलं होतं.



छोटी पिऊही घराच्या खिडकीतून पाऊस बघत होती. तिला पावसात भिजावं, मित्र-मैत्रिणींबरोबर कागदी होड्या करून पाण्यात सोडाव्यात असं वाटत होतं. पण पाऊस एव्हढा जोरात होता, की तिला पावसाची थोडी भीतीही वाटत होती. पाऊस थांबला नाही लवकर, तर पुरात आपलं गाव बुडेल असं तिला वाटत होतं.





पिऊने खिडकीतून जरा वाकून बघितलं. पावसाचं पाणी जोरात वाहत होतं. अचानक तिला लांबून खोक्यासारखं काहीतरी वाहत येताना दिसलं. तिला वाटलं -- काय असेल बरं ते? थोड्याच वेळात ती वस्तू जवळ आली. ते काय असावं ते अजूनही तिला कळत नव्हतं. छोट्या पेटी अथवा खोक्यासारखं ते काय असेल याची तिला उत्सुकता वाटली. पाणी एवढं होतं, की थोड्याच वेळात ती छोटी पेटी बुडून गेली असती.



Piu aur Uske dostt-Marathi 12-10-2019.indd 5 19-12-2019 13:10:11



पिऊला राहावलं नाही. गुपचूप ती घराच्या बाहेर आली. पावसात चिंब भिजत, रस्त्यावर जोरात वाहणाऱ्या पाण्यातून ती कशीबशी त्या पेटीजवळ पोहोचली. तिने पटकन पेटी उचलून घेतली आणि गुपचूप घरात आली, पण घरात येताच तिला जोरदार शिंक आली. तो आवाज ऐकून आई आली आणि तिला रागावून म्हणाली, ''पुन्हा तू पावसात भिजायला गेली होतीस?'' ''अगं आई, मी ते ...'' पिऊने सांगायचा प्रयत्न केला.



‘‘लवकर कपडे बदल,’’ असं म्हणून आईनं तिला दुसरे कपडे घालायला दिले. आई खूप चिडलेली होती. पिऊने ती पेटी तिच्या अभ्यासाच्या टेबलावर ठेवली. आई रागावल्यामुळे एकदा पिऊला वाटलं - ‘फेकून द्यावी ती जुनाट पेटी’. पण मग तिला त्या पेटीची दया आली. ‘पावसात भिजल्यामुळे आपल्याला जशी थंडी वाजतेय, तशी या छोट्या पेटीलाही वाजत असेल,’ असं वाटून तिने एका पंचाने पेटी पुसून ठेवली आणि नंतर झोपून गेली.





“पिऊ! ए छोटुल्या पिऊ!” अशा हाकेने पिऊला जाग आली. तिला कोणीतरी हाक मारत होतं. कोण असेल एव्हढ्या रात्री? तिनं विचारलं, “कोण हाक मारतंय मला?” “पिऊ, अगं ए छोटुल्या पिऊ! आम्ही आहोत रंगीबेरंगी पेन्सिली,” त्या पेटीतून आवाज येत होता.





पिऊने ती पेटी उघडण्याचा प्रयत्न केला, पण ती उघडली गेली नाही. ‘‘अगं पिऊ, ही किनई जादूची पेटी आहे. ही उघडण्यासाठी म्हण, ‘‘इग्गा बिग्गा डिग्गा - माझा जादूचा डब्बा, इली-इली, गिली-गिली, सिली-सिली छू, उघड जादुई पेटी तू!’’





पिऊने घाबरत घाबरतच तो मंत्र म्हटला. मंत्र म्हणताच तिच्या खोलीत प्रखर प्रकाश पसरला. पिऊने टेबलाजवळ जाऊन पाहिलं. ती पेटी उघडली होती आणि त्यातूनच उजेड येत होता. त्या पेटीत खूपशा रंगबेरंगी पेन्सिली आणि एक खोडरबर होते. ‘‘पिऊ घाबरू नकोस आम्ही तुझे मित्र आहोत,’’ खोडरबर म्हणाले.





‘किती छान आणि सुंदर पेन्सिली आहेत ... पण हा पाऊस कसला पडतोय! मित्र मैत्रिणींना दाखवणार कसे? चित्र काढायलाही सुचणार नाही!’ पिऊ विचार करत होती. ‘‘पाऊस कधी थांबेल असाच विचार करते आहेस ना...?’’ खोडरबराने विचारलं. तेव्हढ्यात निळी पेन्सिल हसून म्हणाली, ‘‘अगदी सोप्पंय. या रबरानं पाऊस खोडून टाक!’’ पिऊला थोडा रागच आला. खोडरबराने कुठे ढग खोडले जाऊ शकतात...?





''अगं पिऊ, एकदा प्रयत्न तर करून बघ,'' रोणी पेन्सिल म्हणाली. पिऊने खोडरबर घेतलं आणि खिडकीतून हात बाहेर काढून पावसाची धार ती खोडायला लागली. ''अरे! कसं शक्य आहे हे?'' पिऊ आश्चर्यानं ओरडलीच. कारण पावसाची धार चक्क खोडली गेली होती. तिने खोडल्यामुळे आता तिच्या खिडकीसमोर फक्त पाऊस पडत नव्हता, बाकी इतर सगळीकडे पडत होता.



''पिऊ चल, आता काळे ढगही खोडून टाकू,'' लाल पेन्सिल म्हणाली. ''पण बाहेर जाणार कसं? माझ्याकडे छत्री नाही,'' पिऊ म्हणाली. लगेच पिवळ्या पेन्सिलीने हसत म्हटलं, ''तू स्वतः तयार करून का घेत नाहीस?''

''अरे हो की! विसरलेच होते,'' गिरकी घेऊन हसत पिऊ म्हणाली. मग तिने जादूच्या पेन्सिलीने एक छत्री आणि एक नावही काढली आणि दोन्ही घेऊन ती घराबाहेर आली.



बाहेर पडल्यावर छत्री घेऊन, नावेत बसून पिऊ भराभर पावसाच्या धारा आणि काळे ढग खोडायला लागली. थोड्याच वेळात काळ्या ढगांच्या मागे लपलेलं निळं आकाश दिसायला लागलं.



‘पाऊस तर थांबला, पण वाहून किंवा खराब झालेल्या पिकांचे काय? सगळी पिकं वाहून गेली आहेत.’ पिऊ विचारात पडली. आता हिरवी पेन्सिल म्हणाली, ‘‘पिऊ! पिकांचा विचार करते आहेस ना? तू तेही पुन्हा तयार करू शकतेस.’’ हे लक्षात न आल्यामुळे थोडी लाजून पिऊ म्हणाली, ‘‘ओह, मी विसरलेच होते, माफ कर हं,’’ असं म्हणून मग तिने पुन्हा जादूची पेन्सिल घेतली आणि ती कामाला लागली.



सगळीकडे साठलेलं जास्तीचं पाणी पिऊने भराभर खोडलं. थोड्याच वेळात गावातलं सगळं साठलेलं पाणी नाहीसं झालं. उरलेले  काही काळे ढगही तिने खोडले. स्वच्छ निळं आकाश दिसू लागलं.



पिऊच्या मदतीला आता बाकीच्या जादूच्या पेन्सिलीही आल्या. सगळ्यांनी मिळून काम करायला सुरुवात केली. बघता बघता त्यांनी सगळे गाव सुंदर रंगांनी मस्त रंगवून टाकले. भुरकट रंगाची पेन्सिल म्हणाली, ''आपण अजून काही नवं वेगळं करायचं का?'' खोडरबराने दुजोरा देत म्हटलं, ''होय मित्रांनो, आपण काहीतरी वेगळं करूया!''





पिऊ आणि तिच्या जादुई मित्रांनी मग सगळं गावच जादूनगरीसारखं सजवलं. हे करतांना पिऊला खूपच मजा आली, पण खूप रात्र झाल्यामुळे आणि दमल्यामुळे तिला झोप यायला लागली. पिऊ घरी आली. तिने छत्री आणि नाव रबराने खोडून टाकलं आणि पांघरूणात शिरून गुडूप झोपून गेली.



‘‘पिऊ उठ गं.’’ आईच्या हाकेने तिला सकाळी जाग आली. आई सांगत होती, ‘‘बघ सगळं गाव कसं जादूच्या नगरीसारखं झालंय, काळेकुट्ट ढग गेले आणि लख्ख ऊन पडलंय. जादूच झाली. पावसानं जी पिकं वाहून गेली होती, ती पुन्हा तरारली आहेत. सगळ्या लोकांना याचं आश्चर्य वाटतंय. चल उठ लौकर, आपल्या शेतात जाऊन बघू.’’



‘‘जादू? कसली जादू? मला झोपू दे ना आई!’’ पिऊ डोळे चोळत म्हणाली. ‘‘आळशी कुठली, बरं झोप तू,’’ तिचं पांघरूण नीट करत आई लाडानं म्हणाली, ‘‘मी शेतात जाऊन बघते, तू घराकडे लक्ष दे,’’ असं सांगून आई बाहेर गेली. पिऊने हसून जादूच्या पेन्सिलींच्या पेटीकडे बघितलं. नंतर पेटी कुरवाळत ती म्हणाली, ‘‘धन्यवाद मित्रांनो!’’

# पिऊ आणि तिचे जादुई मित्र

कथा आणि रेखाचित्रे

**सोरित गुप्तो**

अनुवाद

**राधिका गोडबोले**

